**भारतरत्न डॉ. बाबासाहेब आंबेडकर सामाजिक समता सप्ताह कार्यक्रम साजरा करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : सान्यावि-२०२५/प्र.क्र.२७/बांधकामे**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
दिनांक :- ०४ एप्रिल, २०२५.

**संदर्भ - सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग, शासन निर्णय, क्रमांक : सान्यावि-२०२२/ प्र.क्र.७८/बांधकामे, दिनांक ५.४.२०२२.**

**प्रस्तावना :-**

भारतरत्न डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांनी भारतीय राज्यघटनेद्वारे देशाला स्वातंत्र्य, समता व बंधुता या तत्वांच्या माध्यमातून भारतीय समाजामध्ये एकात्मता निर्माण करण्याचा प्रयत्न केलेला आहे. भारतीय राज्यघटनेच्या कलम ४६ मध्ये समाजातील दुर्बल घटक व वंचितांबाबत राज्याची जबाबदारी अत्यंत दुरदर्शीपणाने व गांभीर्याने नमूद केलेली आहे. **भारतीय राज्यघटना कलम ४६ अनुसूचित जाती, अनुसूचित जनजाती आणि इतर दुर्बल घटक यांचे शैक्षणिक व आर्थिक हितसंवर्धन:** यामध्ये "राज्य, जनतेतील दुर्बल घटक, आणि विशेषत: अनुसूचित जाती, अनुसूचित जनजाती यांचे शैक्षणिक व आर्थिक हितसंवर्धन विशेष काळजीपूर्वक करील आणि सामाजिक अन्याय व सर्व प्रकारचे शोषण यांपासून त्यांचे रक्षण करील." असे नमूद करण्यात आले आहे. भारतीय राज्यघटनेतील या तत्वांच्या अनुषंगाने अनुसूचित जाती, अनुसूचित जनजाती आणि इतर दुर्बल घटक तसेच सर्व प्रकारचे पीड़ीत आणि शोषितांना सामाजिक न्याय, आर्थिक व सामाजिक संरक्षण उपलब्ध करून देण्याबाबत राज्य सरकार सातत्याने प्रयत्नशील आहे. त्यानुषंगाने अनुसूचित जाती, अनुसूचित जनजाती व वंचित दुर्बल घटकातील व्यक्तींच्या सर्वांगीण विकासाचे ध्येय साध्य करण्यासाठी राज्य शासनाकडून विविध कल्याणकारी योजना राबविण्यात येत आहेत. या सर्व कल्याणकारी योजनांची माहिती सर्वसामान्य जनतेला व्हावी तसेच जनतेत जनजागृती निर्माण व्हावी याउद्देशाने दरवर्षी दि. ८ एप्रिल ते १४ एप्रिल या कालावधीत राज्यात "**भारतरत्न डॉ. बाबासाहेब आंबेडकर सामाजिक समता सप्ताह**" हा कार्यक्रम साजरा करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:-**

अनुसूचित जाती, अनुसूचित जनजाती व वंचित दुर्बल घटकातील व्यक्तींच्या सर्वांगीण विकासाचे ध्येय साध्य करण्यासाठी राज्य शासनाकडून विविध कल्याणकारी योजनांची माहिती सर्वसामान्य जनतेला व्हावी तसेच जनतेत जनजागृती निर्माण व्हावी याउद्देशाने दरवर्षी दि.८ एप्रिल ते १४ एप्रिल या कालावधीत राज्यात "**भारतरत्न डॉ. बाबासाहेब आंबेडकर सामाजिक समता सप्ताह**" हा कार्यक्रम साजरा करण्यासाठी राज्यातील सर्व प्रशासकीय विभागाच्या अधिनस्त सर्व कार्यालयांनी व विभागीय आयुक्त आणि जिल्हाधिकारी यांनी त्यांच्या अधिनस्त असणाऱ्या सर्व कार्यालयांनी खालील तक्त्यात नमूद केल्याप्रमाणे कार्यक्रमांचे आयोजन करण्याचे निर्देश या शासन निर्णयान्वये देण्यात येत आहेत:-

| **दिनांक** | **कार्यक्रम/उपक्रम** | **कार्यक्रम राबविणारी यंत्रणा** |
|---|---|---|
| मंगळवार,<br>दि.०८ एप्रिल, २०२५ | भारतरत्न डॉ. बाबासाहेब आंबेडकर सामाजिक समता सप्ताह या कार्याक्रमाचे उदघाटन करणे व पत्रकार परिषदेचे आयोजन करून सदर कार्यक्रमांची जनतेला माहिती देणे. | सर्व प्रादेशिक उपायुक्त, समाजकल्याण, सर्व सहायक आयुक्त, समाजकल्याण व सर्व जिल्हा समाज कल्याण अधिकारी, जिल्हा परिषद. |
| मंगळवार,<br>दि.०८ एप्रिल, २०२५<br>ते<br>सोमवार,<br>दि.१४ एप्रिल, २०२५ | भारतीय संविधानाची उद्देशिका/ प्रस्ताविका यांचे वाचन करून भारतीय जनतेत संविधाना विषयी जनजागृती निर्माण करणे. | सर्व प्रादेशिक उपायुक्त, समाजकल्याण, सर्व सहायक आयुक्त, समाजकल्याण व सर्व जिल्हा समाज कल्याण अधिकारी, जिल्हा परिषद. |
| बुधवार,<br>दि.०९ एप्रिल, २०२५ | विभागातील सर्व शाळा, महाविद्यालये, शासकीय वसतिगृहे येथे भारतरत्न डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांच्या विचांरावर आधारीत वक्तृत्व स्पर्धा, निबंध स्पर्धा, लघुनाट्य स्पर्धा इत्यादी कार्यक्रमांचे यशस्वी आयोजन करणे. | सर्व प्रादेशिक उपायुक्त, समाजकल्याण, सर्व सहायक आयुक्त, समाजकल्याण व सर्व जिल्हा समाज कल्याण अधिकारी, जिल्हा परिषद. |
| | जिल्हा व विभागीय स्तरावर कार्यक्रमाचे आयोजन करून विभागामार्फत राबविण्यात येणाऱ्या सर्व योजनांचा लाभ प्रातिनिधिक स्वरूपात लाभार्थ्यांना वाटप करणे. | |
| गुरूवार,<br>दि.१० एप्रिल, २०२५ | विभागामध्ये समतादूतांमार्फत ग्रामीण व शहरी भागात पथनाट्य व लघुनाटिका या द्वारे सामाजिक न्याय विभागाच्या विविध योजनांबाबत जनतेचे प्रबोधन करणे. | सर्व प्रादेशिक उपायुक्त, समाजकल्याण, सर्व सहायक आयुक्त, समाजकल्याण व सर्व जिल्हा समाज कल्याण अधिकारी, जिल्हा परिषद.<br>महासंचालक, डॉ.बाबासाहेब आंबेडकर संशोधन व प्रशिक्षण संस्था, पुणे. |
| | सहाय्यक आयुक्त, समाज कल्याण यांचे मार्फत प्रत्येक जिल्ह्यात मार्जिन मनी योजनेंतर्गत कार्यशाळा आयोजित करणे. तसेच सदर योजनेचा लाभ घेतलेल्या लाभार्थ्यांची कार्यशाळा आयोजित करणे. | |
| शुक्रवार,<br>दि.११ एप्रिल, २०२५ | क्रांतीसुर्य महात्मा ज्योतिबा फुले यांची जयंती साजरी करणे. तसेच महात्मा फुले यांच्या सामाजिक कार्याविषयी वक्ता बोलावून कार्यक्रमांचे आयोजन करणे. | सर्व प्रादेशिक उपायुक्त, समाजकल्याण, सर्व सहायक आयुक्त, समाजकल्याण व सर्व जिल्हा समाज कल्याण अधिकारी, जिल्हा परिषद. |
| शनिवार,<br>दि.१२ एप्रिल, २०२५ | संविधान जागर- भारतीय संविधाना विषयी सर्वसाधारण माहिती देणे जसे की, संविधानाची निर्मिती, संविधान निमिर्ती समिती, अनुच्छेद, विशेषत: मुलभूत अधिकार व मुलभूत कर्तव्ये याविषयी व्याख्यान आयोजित करणे (किमान ६० ते ९० मि.). | सर्व प्रादेशिक उपायुक्त, समाजकल्याण, सर्व सहायक आयुक्त, समाजकल्याण व सर्व जिल्हा समाज कल्याण अधिकारी, जिल्हा परिषद. |

| दिनांक | कार्यक्रम/उपक्रम | कार्यक्रम राबविणारी यंत्रणा |
|---|---|---|
| | सहाय्यक आयुक्त, समाजकल्याण या कार्यालयात महिला मेळावा आयोजित करून भारतरत्न डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांनी महिलांसाठी केलेल्या कार्याबद्दल माहिती देणारे व्याख्यान आयोजित करणे. | |
| रविवार, दि.१३ एप्रिल, २०२५ | १. प्रत्येक जिल्ह्यात जेष्ठ नागरिकांसाठी जनजागृती शिबीर व ज्येष्ठ नागरिकांचा मेळावा आयोजित करणे. तसेच प्रत्येक जिल्हयात जिल्हा आरोग्य अधिकारी यांच्या सहकार्याने विभागातील सर्व शाळा, महाविद्यालये, शासकीय वसतिगृहे येथे रक्तदान शिबीराचे आयोजन करणे.<br>२. सर्व शासकीय कार्यालयांमध्ये स्वयंसेवी संस्थांच्या सहाय्याने जिल्हयातील सर्व महत्वाच्या ठिकाणी व अनुसूचित जाती व नवबौध्द घटकांच्या वस्त्यांमधून स्वच्छता अभियान राबविणे. | सर्व प्रादेशिक उपायुक्त, समाजकल्याण, सर्व सहायक आयुक्त, समाजकल्याण व सर्व जिल्हा समाज कल्याण अधिकारी, जिल्हा परिषद. |
| सोमवार, दि.१४ एप्रिल, २०२५ | १. सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभागाच्या अधिनस्त सर्व शासकीय कार्यालये, शाळा, महाविद्यालये येथे भारतरत्न डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांना अभिवादन व इतर कार्यक्रम, व्याख्याने, चर्चासत्र इत्यादी कार्यक्रमांचे आयोजन करणे. सदर कार्यक्रमास उपस्थित राहण्याकरिता संबंधित लोकप्रतिनिधींना निमंत्रित करणे .<br>२. जिल्हास्तरावर कर्मवीर दादासाहेब गायकवाड सबळीकरण व स्वाभिमान मेळावा आयोजित करून भारतरत्न डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांनी शेतकऱ्यांसाठी केलेल्या कार्याबद्दल माहिती सांगणारे व्याख्यान आयोजित करणे.<br>३. सदर दिवशी विभागातील सर्व जिल्हा जात प्रमाणपत्र पडताळणी समिती कार्यालयात Online-Validity प्रमाणपत्र प्रदान करणे.<br><br>भारतरत्न डॉ. बाबासाहेब आंबेडकर सामाजिक समता सप्ताहाचे समारोप. | सर्व प्रादेशिक उपायुक्त, समाजकल्याण, सर्व सहायक आयुक्त, समाजकल्याण व सर्व जिल्हा समाज कल्याण अधिकारी, जिल्हा परिषद. सर्व जिल्हा जात प्रमाणपत्र पडताळणी समिती . |

२. उपरोक्त कार्यक्रमात परिस्थितीनुसार स्थानिक स्तरावर बदल करावयाचा असल्यास तो संबंधित प्रादेशिक उपायुक्त, समाजकल्याण व सहाय्यक आयुक्त, समाजकल्याण, यांच्या स्तरावर करता येईल.

३. "**भारतरत्न डॉ. बाबासाहेब आंबेडकर सामाजिक समता सप्ताह**" हा कार्यक्रम यशस्वीरित्या आयोजित करण्याची सर्वस्वी जबाबदारी ही संबंधित जिल्हयातील सहाय्यक आयुक्त, समाजकल्याण यांची राहील. सदर कार्यक्रम यशस्वीपणे आयोजन करण्याची व पर्यवेक्षणाची जबाबदारी आयुक्त, समाजकल्याण, पुणे यांच्या मार्गदर्शनाखाली संबंधित प्रादेशिक उपायुक्त, समाजकल्याण यांची राहील.

४. सदर कार्यक्रम अंमलबजावणीच्या अनुषंगाने जिल्हानिहाय एकत्रित सविस्तर अहवाल आयुक्त, समाजकल्याण, पुणे यांनी दरवर्षी शासनास सादर करावा.

५. सदर शासन निर्णय हा महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक २०२५०४०४१२५८२८५५२२ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

SOMNATH NAMDEO BAGUL

Digitally signed by SOMNATH NAMDEO BAGUL
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=SOCIAL JUSTICE AND SPECIAL ASSISTANCE DEPARTMENT, 2.5.4.20=b01714c1480a47cec5943a1c3c73ea95af0534418cf92d1ac844331c4116879d, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=4807C89831881EDE55B0D82CB9991539D1BD33C6F8A64931D9194D5E2CBDCF56, cn=SOMNATH NAMDEO BAGUL
Date: 2025.04.04 13:24:49 +05'30'

**(सो.ना.बागुल)**
**सह सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा.राज्यपाल यांचे सचिव, राजभवन, मलबार हिल, मुंबई.
२. मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई.
३. मा.उपमुख्यमंत्री, यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई.
४. मा. मंत्री / राज्यमंत्री (सर्व) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
५. मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य, मुंबई .
६. अप्पर मुख्य सचिव / प्रधान सचिव/सचिव, सर्व प्रशासकीय विभाग, मंत्रालय, मुंबई.
७. सर्व विभागीय आयुक्त, महसुल विभाग.
८. आयुक्त, समाजकल्याण, पुणे.
९. सर्व जिल्हाधिकारी.
१०. सर्व मुख्य कार्यकारी अधिकारी,जिल्हा परिषद.
११. महासंचालक ,डॉ. बाबासाहेब आंबेडकर संशोधन व प्रशिक्षण केंद्र, पुणे.
१२. महासंचालक, माहिती व जनसंपर्क महासंचालनाय, मंत्रालय, मुंबई.
१३. संचालक, महात्मा फुले मागासवर्गीय विकास महामंडळ मर्यादित, मुंबई.
१४. व्यवस्थापकीय संचालक, साहित्यरत्न लोकशाहीर अण्णाभाऊ साठे विकास महामंडळ मर्यादित, मुंबई.
१५. व्यवस्थापकीय संचालक, संत रोहिदास चर्मोद्योग व चर्मकार विकास महामंडळ मर्यादित, मुंबई.
१६. व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य अपंग आर्थिक विकास महामंडळ मर्यादित, मुंबई.
१७. अध्यक्ष, सर्व जिल्हा जात प्रमाणपत्र पडताळणी समिती.
१८. सर्व प्रादेशिक उपायुक्त, समाजकल्याण विभाग.
१९. सर्व सहायक आयुक्त, समाजकल्याण.
२०. सर्व जिल्हा समाज कल्याण अधिकारी, जिल्हा परिषद.
२१. सर्व सह / उपसचिव, अवर सचिव, कक्ष अधिकारी, सा.न्या. व.वि.स. विभाग, मंत्रालय, मुंबई.